राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानांतर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठी पाचव्या हप्त्याच्या समरूप राज्य हिश्यापैकी उर्वरीत रु.५३.७१७३२ लक्ष निधी वितरीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा -**

१. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.१५.०६.२०२३
२. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. कृआ./आत्मा/वाकृआ/प्रशा. मं./३५४/२०२३, दि.१६.०६.२०२३
३. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र. १५/लेखा/पुराही/ /३५३/२३, दि. १६.०६.२०२३
४. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे, दि.२०/०६/२०२३
५. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे, दि.१२/०७/२०२३
६. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.२८.०८.२०२३
७. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.१५/लेखा/पुराही/ /५२८/२३, दि. २९.०८.२०२३
८. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.१६.११.२०२३
९. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.१५/लेखा/पुराही/सर्व./७५७/२३, दि. २०.११.२०२३
१०. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे, दि.२१/१२/२०२३
११. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.३६-२८/२०१७-अेई/विस्तार कक्ष, दि.०८.०२.२०२४
१२. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.८७/लेखा/पुराही/सर्व./९/२४, दि. ०९.०२.२०२४
१३.कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे, दि.२१.०२.२०२४
१४. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफ.नं.९-२/२०२३-अेई/विस्तार कक्ष, दि.२२.०३.२०२४
१५. संचालक (आत्मा), यांचे पत्र क्र. आत्मा/प्र.क्र.०१/लेखा/पुराही/९६९२/२४, दि. २३.०३.२०२४
१६. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/३-अे, दि.२८.०३.२०२४
१७. कृषि व पदुम विभाग शा. नि. क्र. पुनर्वि-२०२३/प्र.क्र.१३१(५)/२-अे, दि.३१.०३.२०२४

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत ( NMAET) कृषि विस्तार उप अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप अभियानात राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या ६०:४० अर्थसहाय्याच्या

प्रमाणात राबविण्यात येते. सदर योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यासाठी केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि.१५.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या सुचनांस अनुसरुन सदर योजनेचा एकूण रु. ६०१४.५८ लक्ष रकमेचा राज्य कृति विस्तार आराखडा (SEWP) कृषि आयुक्तालयाने उपरोक्त संदर्भाधीन दि. १६.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शासनास मान्यतेस्तव सादर केला होता. आत्मा योजनेच्या सदर रु. ६०१४.५८ लक्ष रकमेच्या आराखड्यास राज्य प्रकल्प मंजूरी समितीने (SLSC) दि.१७.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिली असुन त्यानुसार सदर आराखड्यास विभागाकडून दि. २०.०६.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

केंद्र शासनाने सन २०२३-२४ करिता आत्मा योजनेकरिता संदर्भाधीन दि.२२.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिश्याचा सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु. २०५.६० लक्ष निधी वितरीत केला आहे, त्यानुषंगाने समरुप राज्य हिश्याचा एकूण रु. १३७.०७ लक्ष निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक (आत्मा) यांनी दि. २३.०३.२०२४ च्या पत्रान्वये शासनास सादर केला होता. संदर्भाधीन दि.२८.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ करिता सदर योजने अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी पाचव्या हप्त्याकरिता केंद्र हिस्सा रु. २०५.६० लक्ष व समरुप राज्य हिश्यापैकी उपलब्ध निधीच्या मर्यादेत रु. ८३.३५२६८ लक्ष असा एकूण रु. २८८.९५२६८ लक्ष इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आला आहे.

आत्मा अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण प्रवर्गाकरिता अर्थसंकल्पित लेखाशीर्ष २४०१ ४४४५ अंतर्गत केंद्र हिस्स्याकरिता रु.३०००.०० लक्ष व लेखाशीर्ष २४०१ ४४३६ अंतर्गत राज्य हिस्स्याकरिता रु.१६००.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. संदर्भाधीन दि.१२.०७.२०२३, दि.०४.१०.२०२३, दि.२१.१२.२०२३, दि.२१.०२.२०२४ व दि.२८.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयांन्वये आत्मा योजनेंतर्गत सन २०२३-२४ करिता पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या व पाचव्या हप्त्याचा सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. २४८०.५५६ लक्ष व राज्य हिस्सा रु.१५९९.९९ लक्ष असा एकूण रु. ४०८०.५४६ लक्ष इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आला आहे.

संचालक (आत्मा) यांनी दि.२३.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता आत्मा अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी पाचव्या हप्त्याचा केंद्र हिस्सा रु. २०५.६० लक्ष व पूरक राज्य हिस्सा १३७.०७ लक्ष निधी वितरीत करणेबाबत विनंती केली होती. मात्र पूरक राज्य हिश्यापैकी रू. ८३.३५२६८ लक्ष इतका निधी शिल्लक असल्याने उर्वरीत रू. ५३.७१७३२ लक्ष इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्याची विनंती नियोजन व वित्त विभागास करण्यात आली होती, त्यानुसार वित्त विभागाने सदर योजनेसाठी रू. ५३.७१७३२ लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी संदर्भ क्र.१७ येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाने उपलब्ध झाला असून तो वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :**

१. सन २०२३-२४ करिता केंद्र पुरस्कृत राज्य कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्यासाठी सहाय्य उप अभियान या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता सर्वसाधारण

प्रवर्गासाठी पाचव्या हप्त्याकरिता समरूप राज्य हिश्यापैकी उर्वरीत रू. ५३.७१७३२ लक्ष (अक्षरी रूपये त्रेपन्न लक्ष एकाहत्तर हजार सातशे बत्तीस फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि) चालू वर्षी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी समरूप राज्य हिश्यापैकी उर्वरीत रू. ५३.७१७३२ लक्ष (अक्षरी रूपये त्रेपन्न लक्ष एकाहत्तर हजार सातशे बत्तीस फक्त) निधी चालू वर्षी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३, २४०१ पीक संवर्धन, १०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण, (०१) माहिती व प्रचार, (०१) (४३) - कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (आत्मा) -उप अभियान ( केंद्र पुरस्कत योजना) (राज्य हिस्सा ४०%) (२४०१ ४४३६), ३३ अर्थसहाय्य

३. आत्मा योजनेकरीता प्रत्यक्ष वितरीत करण्यात येणा-या निधीच्या मर्यादेत योजनेची अंमलबजावणी करावी.

४. आयुक्त (कृषि) यांनी या योजनेसाठी केंद्र शासनाने विहीत केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन योजनेंतर्गत उद्दिष्ट निहाय अंमलबजावणीच्या सविस्तर सूचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात, त्यामध्ये पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्यात याव्यात.

५. लाभार्थी निवडताना अत्यल्प व अल्प भू-धारक, महिला शेतकरी व मागासवर्गीय शेतकऱ्यांना प्राधान्य देण्यात यावे व अशा लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाबाबत स्वतंत्र नोंदी ठेवाव्यात.

६. या कार्यक्रमाचे मुल्यमापन त्रयस्थ संस्थेकडुन (Third Party Evaluation) करून घ्यावे.

७. सन २०२३-२४ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये/ पंचायत समिती/जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच, ती यादी कृषि विभागाच्या वेबसाईटवर देखील प्रदर्शित करावी.

८. सन २०२३-२४ मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि),<br>कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

९. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस प्रणालीव्दारे वितरीत करावा.

१०. सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे ( Audited Utilizaton Certificates ) सत्वर सादर करावीत.

११. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.सं.क्र.२३८/कार्या-१४३१,दि. २८.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.१५३/२०२४/व्यय-१, दि.३०.०३.२०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेने तसेच वित्त विभागाचे परिपत्रक दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३ व ०४.०३.२०२४ मधील तरतूदींस अनुसरून व प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३११६३४३२४७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN BALKRISHNA SHELKE

Digitally signed by NITIN BALKRISHNA SHELKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=b16a0c5db615c4a06ea8fabd13af127400ce480c79ca9b8e4bf887b336c689c6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D1F1CAE455725E2C3EEC068328EA22C16337CBE88F3D0FBD5A6BC7E7898A04E9, cn=NITIN BALKRISHNA SHELKE
Date: 2024.03.31 16:44:00 +05'30'

**( नितीन शेळके )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति** -

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय, पुणे
४. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, पुणे
५. सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून)
६. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
९. संचालक वनामती, नागपूर
१०.उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
११.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१२.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१३.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
१४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५.कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१७.महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१८. वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
१९.नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
२०.कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती (कार्यासन-३अे)